"पंचरंगी पठ्ठेबापूराव" या सांस्कृतिक कार्यक्रमास
विशेष बाब म्हणून निधी उपलब्ध करुन देणेबाबत

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२१९/प्र. क्र. १२/सां.का.४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ४ फेब्रुवारी, २०१९

प्रस्तावना :-

मुंबई विद्यापीठ लोककला अकादमीच्या माध्यमातून आयोजित करण्यात येणा-या "पंचरंगी पठ्ठेबापूराव" या सांस्कृतिक कार्यक्रमासाठी येणा-या खर्चास एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

या शासन निर्णयान्वये मुंबई विद्यापीठ लोककला अकादमी यांना "पंचरंगी पठ्ठेबापूराव" हा सांस्कृतिक कार्यक्रम महाराष्ट्रात वेगवेगळया तीन ठिकाणी आयोजित करण्यासाठी प्रति कार्यक्रम रुपये २,००,०००/- याप्रमाणे तीन कार्यक्रमांसाठी एकूण रुपये ६,००,०००/- (अक्षरी रुपये सहा लाख फक्त) इतके एकवेळचे अनुदान "एक विशेष बाब" म्हणून मंजूर करण्यात येत आहे. हे अनुदान सर्व समावेशक असून नाटयगृह भाडे, ध्वनी/प्रकाश व्यवस्था, जाहिरात, कलावंत निवास खर्च यासारख्या अन्य खर्चांकरिता कोणतेही वेगळे अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

२. सदर खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती यांचे प्रचालन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०२) राज्य, नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या अनुदानाचा धनादेश "Finance & Accounts Office, University of Mumbai" या नावे काढण्यात यावा.

४. सदर खर्चास वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग ३, अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूरी देण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद व परिशिष्टातील अटीनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०२०४१७०९१७०१२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2019.02.04 17:13:52 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२ मुंबई/नागपूर महाराष्ट्र राज्य
९. महालेखापाल (लेखा परीक्षा ) - १/२ मुंबई/नागपूर महाराष्ट्र राज्य
१०.अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
११.निवड नस्ती, सां.का.४